**पर्यटन उपविभागांतर्गत पर्यटन विषयक ई-प्रशासन प्रकल्प राबविणे व इतर बाबींसदर्भात मार्गदर्शन व सल्ला देण्यासाठी मे.के.पी.एम.जी. या सल्लागार कंपनीच्या सल्लागारांच्या नियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक टिडीएस २०१९/२/प्र.क्र. ११५५/पर्यटन**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २६ ऑगस्ट, २०२०.

संदर्भ:-१) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक टिडीएस-२०१९/ २/ प्र.क्र.११५५/पर्यटन, दि.२९.१२.२०१९
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक टिडीएस-२०१९/ २/ प्र.क्र.११५५/पर्यटन, दि.२६.०२.२०२०

वाचा :-

पर्यटन उपविभागांतर्गत पर्यटन विषयक ई-प्रशासन प्रकल्प राबविणे व इतर बाबीसंदर्भात मार्गदर्शन व सल्ला देण्याकरिता संदर्भाधिन दि.२९.१२.२०१८ च्या शासन निर्णयाद्वारे सचिव (पर्यटन) यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती (पी.आय.सी.) स्थापन करण्यात आली आहे. सदर समितीची दि.७.१.२०१९ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत M/s. Earnst and Young आणि मे.के.पी.एम.जी. या सल्लागार कंपन्यानी प्रस्तुत विषयाबाबत सादरीकरण केले तसेच दि.०८.१.२०२१९ रोजी मे. पी.डब्लू. सी. या कंपनीने प्रस्तुत विषयाबाबत सादरीकरण केले. या तीन कंपन्यापैकी मे.के.पी.एम.जी. या सल्लागार कंपनीने केलेले सादरीकरण समाधानकारक आढळल्याने समितीने पर्यटन उपविभागांतर्गत पर्यटन विषयक ई-प्रशासन प्रकल्प राबविणे व इतर बाबींसंदर्भात मार्गदर्शन व सल्ला देण्याकरिता मे.के.पी.एम.जी. या कंपनीची निवड केली आहे.

२. प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या निर्णयानुसार पर्यटन उपविभागांतर्गत पर्यटन विषयक ई-प्रशासन प्रकल्प राबविणे व इतर बाबीसंदर्भात मार्गदर्शन व सल्ला देण्याकरिता मे.के.पी.एम.जी. या सल्लागार कंपनीच्या खालील प्रतिनिधींची दि.१०.१.२०१९ पासून प्रथमत: १ वर्षाच्या कालावधीसाठी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयाद्वारे नियुक्ती करण्यात आली होती.

१) Principal Consultant -१
२) Managing Consultant -२
३) Senior Consultant -२

३. आता संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये नियुक्त केलेल्या सल्लागारांच्या नियुक्तीस संदर्भ क्र-२ येथील शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या कामकाजाकरिता दि.१०.०१.२०२० ते दि.३०.४.२०२० या कालावधीसाठी या शासन निर्णयाद्वारे मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०२००८२७१२४३२६२८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d232bb3a3fcc8, serialNumber=c8fbeb4e149e205d858dabb5d81a2a90a8deb719257572300ef79cfab47d9345, cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2020.08.31 11:28:38 +05'30'

**( र. ज.कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा.मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव,
४. मा.राज्यमंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव,
५. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव (पर्यटन), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई,
१२.संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१३.उप सचिव (पर्यटन), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१५.मे.के.पी.एम.जी.ॲडव्हायझरी सर्व्हिसेस प्रा.लि.लोढा एक्सेलस (Excelus), १ मजला, अपोलो मिल्स कंपाउन्ड, एन.एम. जोशी मार्ग, महालक्ष्मी, मुंबई - ४०० ०११,
१६.निवडनस्ती (पर्यटन).